महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना याकरिता पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक-पोकुआ-०५१७/प्र.क्र.३३६/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

**दिनांक ०५ जून २०१७**

वाचा :-
१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१२०४/१४३/प्र.क्र.२/ भाग-३/पोल-७, दिनांक २८.०७.२००६.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-१३/कुआयो/१४४३/१७, दिनांक ०६.०५.२०१७.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्याच्या पोलीस दलातील अधिकारी/ कर्मचारी व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबातील व्यक्तीकरिता महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना राबविण्यात येते. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी संदर्भ क्र.२ मधील पत्रान्वये सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी या योजनेकरिता करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यांनी मागणी केल्यानुसार सदर योजनेचा खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना राबविण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून सदर योजनेचा खर्च भागविण्याकरिता रु.३०,००,००,०००/- (रुपये तीस कोटी फक्त) इतकी तरतूद, गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस- (०१) पोलीस आयुक्तांचे कार्यालय, बृहन्मुंबई (०१)(०१) आस्थापना (२०५५ ००७९), ०१, वेतन, या लेखाशीर्षाखाली, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना सन २०१७-१८ या वित्तीय वर्षासाठी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या कार्यालयातील वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, (कक्ष-७/वेतन व लेखा शाखा) यांना सदर रक्कम कोषागार कार्यालयातून काढण्याच्या प्रयोजनार्थ आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६०६१७४३४७०७२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.06.06 17:41:16 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत:-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयत), मुंबई.
५) उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).